जि. धुळे येथील ईव्हीएम साठवणुकीकरीता आवश्यक असलेल्या गोदामाची दुरुस्ती :- प्रशासकीय मान्यता.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्र.ईव्हीएम-२०२०/प्र.क्र.१७६/२०/३३
मंत्रालय मुंबई-४०००३२.
दिनांक - २३ नोव्हेंबर, २०२०

वाचा :- १) जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, धुळे यांचे पत्र क्र.ग/कक्ष- ११/निवडणूक/आस्था/कावि/४४४/२०२०, दि.१९.११.२०२०
२) वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९
३) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९

**शासन निर्णय :-**

जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, धुळे कार्यालयाकडून ईव्हीएम-व्हीव्हीपॅट मशीन्सच्या साठवणुकीसाठी आवश्यक असलेल्या गोदामांच्या दुरुस्तीसाठी सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत अंदाजपत्रक छाननी करुन तांत्रिक सहमतीसह तसेच मुख्य अभियंता यांचे शिफारशीसह एकुण रु.३२,१९०००/- इतक्या किमतीचा प्रस्ताव संदर्भ क्र.१ च्या पत्रान्वये प्रशासकीय मान्यतेस्तव शासनास प्राप्त झाला आहे.

२. सदर प्रस्तावाच्या छाननीअंती अंदाजपत्रकातील कामात समाविष्ट असलेल्या बाबींच्या किंमतीचे विवरण खालीलप्रमाणे आहे.

| Sr.no. | Particular Scope | Component wise | Total |
|---|---|---|---|
| **A** | **Essential Items (Components)** | | |
| 1 | **Godown Building repairing**<br>(a) Ground Floor<br>(b) Testing charges<br>**(c)** Royalty | <br>24,86,268.00<br>16650.00<br>5415.00 | |
| | | **Sub Total (A)** | **25,08,333.00** |
| 2 | Electrical requirements | | 2,00,000.00 |
| | | **Sub Total (2)** | **2,00,000.00** |
| | | **Sub Total (A)** | **27,08,333.00** |
| **B** | **Optional items** | | |
| | CCTV, Fire fighting system | **2,00,000.00** | 2,00,000.00 |
| | | **Sub Total (B)** | **2,00,000.00** |
| | | **Project cost (P) = (A) + (B)** | **29,08,333.00** |

| | | | |
|---|---|---|---|
| C | **Provisions**<br>0.5 % on (A) Insurance<br>12% On (P) for GST | | 12542.00<br>2,98,352.16 |
| | | **Total Amount** | **32,19,227.16** |
| | | **Say** | **32,19,227.16** |

३. वरील तक्त्यात नमूद केल्यानुसार विषयांकित कामाच्या रु.३२,१९००० -/**(रुपये बत्तीस लक्ष एकोनिस हजार फक्त)** इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास शासन या आदेशाद्वारे खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देत आहे.

a. ईव्हीएम व व्हीव्हीपॅटची कायमस्वरुपी साठवणूक करण्यासाठी दुरुस्ती करण्यात येणाऱ्या सदर गोदामांचे बांधकाम कमीत कमी खर्चात व भारत निवडणूक आयोगाच्या मार्गदर्शक तत्त्वांप्रमाणे गुणवत्तापूर्ण होईल याबाबतची जबाबदारी जिल्हाधिकारी यांची राहील, त्याकरीता आवश्यकता असल्यास ई-टेंडरिंग पध्दतीचा वापर करण्यात यावा.

b. ईव्हीएम व व्हीव्हीपॅट मशीन्सच्या साठवणुकीकरीता भारत निवडणूक आयोगाच्या (ECI) दि.०८.०८.२०१७, दि.१२.०३.२०१९ तसेच भारत निवडणूक आयोगाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचना विचारात घेवून सदर गोदामांचे दुरुस्तीचे काम दर्जेदार होईल याची दक्षता घेण्यात यावी.

c. प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा वापर करावा अथवा उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये वस्तू व सेवा खरेदीकरीता केंद्र शासनाने विकसित केलेल्या GeM पोर्टल कार्यपध्दतीचा अवलंब करावा.

d. विषयांकित कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येणार नाही याद्दष्टीने दक्षता घेवून काम लवकरात लवकर पूर्ण करण्यात यावे.

e. काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

f. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

g. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

h. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.०७/०७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

i. वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९ मधील मुद्दा क्र. ३ अन्वये व सार्वजनिक बांधकाम विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९ अन्वये किरकोळ नागरी बांधकामासाठी रु.१५.०० कोटीपेक्षा कमी किंमत असलेल्या अंदाजपत्रकीय रकमेच्या कामांच्या ढोबळ अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील तांत्रिक मान्यता प्रदान करण्यास सक्षम अधिकाऱ्याने तांत्रिक सहमती प्रदान

केल्यानंतर, क्षेत्रिय स्तरावरील सर्वोच्च तांत्रिक अधिकारी असलेल्या संबंधित मुख्य अभियंता यांचे शिफारशीसह प्राप्त अंदाजपत्रकानुसार उपभोक्ता विभागाने प्रशासकीय मान्यता प्रदान करावी, असे नमूद केलेले आहे. त्यानुषंगाने गोदाम दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास क्षेत्रिय स्तरावरील सर्वोच्च तांत्रिक अधिकारी असलेल्या संबंधित मुख्य अभियंता यांची शिफारस आवश्यक आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदींनुसार प्रस्तुत कामाबाबत सर्व जबाबदारी ही संबंधित अधिकाऱ्यांची राहील.

४. प्रस्तुत मान्यता ही सार्वजनिक बांधकाम विभागाचे अभिप्राय, वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०.०९.२०१९ मधील मुद्दा क्र. ३ अन्वये व सार्वजनिक बांधकाम विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५.०९.२०१९ अन्वये तसेच नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.ससमा २०१०प्र.क्र.४८ (भाग-१) / का-१४६१, दिनांक ११ जून, २०१८ नुसार प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२०११२३१२१४५४३३०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

ANIL NANSING VALVI

Digitally signed by ANIL NANSING VALVI
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=1a7c28200f6d58206324d8086ffcf99758c115aada508a7437f2ae5d9fa1ba5d, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=328a78fb26991ef7b9493ea647f585c65b1cf01913ae44b41ffee5cc8464f2f1, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ANIL NANSING VALVI
Date: 2020.11.23 12:22:37 +05'30'

**( अ.ना.वळवी )**
**उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी,**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रति -:**

जिल्हाधिकारी तथा जिल्हा निवडणूक अधिकारी ,धुळे

**प्रत- :**

१. महालेखापाल महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेय) मुंबई.
२. महालेखापाल महाराष्ट्र २ (लेखापरिक्षा), धुळे
३. अधिदान व लेखा अधिकारी, धुळे
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे (पू.),
५. मुख्य अभियंता, सा.बां. प्रादेशिक विभाग, नाशिक
६. अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, धुळे
७. कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, धुळे
८. कार्यासन अधिकारी, इमारती-१/अर्थ-२, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (सा.प्र.वि. कार्यासन ३३).